**संयुक्त राष्ट्राने (United Nations) निश्चित केलेली १७ शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) आणि १६९ लक्ष्ये (Targets) सन २०३० पर्यंत साध्य करणेबाबत....**

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१९/ प्र.क्र.६१/का-१४१२,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०४ फेब्रुवारी, २०२२

**प्रस्तावना :**

संयुक्त राष्ट्राने (United Nations) निश्चित केलेली १७ शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) आणि १६९ लक्ष्ये (Targets) सन २०३० पर्यंत साध्य करण्यासाठी “नोडल विभाग (Nodal Department)” म्हणून “नियोजन विभाग” कार्यरत आहे. तसेच, “अर्थ व सांख्यिकी संचालनालय (Directorate of Economics & Statistics)” अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या “शाश्वत विकास ध्येय-अंमलबजावणी व समन्वय केंद्र (Sustainable Development Goals - Implementation & Co-ordination Centre)” कडून सांख्यिकी माहितीचे प्रमाणीकरण, सुसूत्रीकरण व एकत्रिकरण (Standardization, Rationalization & Integration of Statistical Data) करणे ही जबाबदारी पार पाडली जात आहे. या अंतर्गत (i) राज्यस्तरीय योजना (State Level Schemes) व (ii) जिल्हास्तरीय योजना (District Level Schemes) यांची १७ शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) आणि १६९ लक्ष्ये (Targets) यांच्याशी सांगड (Mapping) घालण्याची कार्यवाही नियोजन विभागाकडून पूर्ण करण्यात आलेली आहे.

२. संयुक्त राष्ट्राने (United Nations) निश्चित केलेली १७ शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) आणि १६९ लक्ष्ये (Targets) सन २०३० पर्यंत साध्य करण्यासाठी “राज्य निर्देशक आराखडा” (State Indicator Framework) व “जिल्हा निर्देशक आराखडा” (District Indicator Framework) याआधारे होणाऱ्या प्रगतीचे “संनियंत्रण व मूल्यमापन (Monitoring & Evaluation)” केले जाणार आहे. वरील पार्श्वभूमीवर राज्य शासनाचे धोरण निश्चित करताना प्रशासकीय विभागांकडून सादर करण्यात येणारी मंत्रिमंडळ टिप्पणी (Cabinet Note) व शासन निर्णय (Government Resolution) यामध्ये वरील १७ शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) आणि १६९ लक्ष्ये (Targets) विचारात घेण्यासंदर्भात प्रशासकीय विभागांना मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

संयुक्त राष्ट्राने (United Nations) निश्चित केलेली १७ शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) आणि १६९ लक्ष्ये (Targets) सन २०३० पर्यंत साध्य होण्यासाठी राज्य शासनाची

धोरण प्रक्रिया निश्चित करताना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून सर्व प्रशासकीय विभागांकडून प्रस्तावित करण्यात येणारे नविन कार्यक्रम / योजना व प्रकल्प हे १७ शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) आणि १६९ लक्ष्ये (Targets) यांपैकी ज्या कोणत्याही एक किंवा अनेक शाश्वत विकास ध्येय आणि संबंधित लक्ष्य यांचेशी निगडीत असतील त्याचा उल्लेख सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांचेकडून सादर करण्यात येणाऱ्या "मंत्रिमंडळ टिप्पणी (Cabinet Note)" व शासन निर्णय (Government Resolution) यामध्ये खालीलप्रमाणे अंतर्भूत करणे अनिवार्य राहील.

**"------------------------" हा कार्यक्रम / योजना व प्रकल्प राबविल्यामुळे शाश्वत विकास ध्येय क्र.--------- चे लक्ष्य क्र.------------- सन २०३० पर्यंत साध्य करण्यास उपयुक्त ठरणार आहे.**

२. प्रशासकीय विभागाने त्यांचेकडून सादर करण्यात येणाऱ्या "मंत्रिमंडळ टिप्पणी (Cabinet Note)" मध्ये वरील मजकूर अंतर्भूत करण्यासाठी अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या अंतर्गत स्थापित करण्यात आलेल्या "शाश्वत विकास ध्येय-अंमलबजावणी व समन्वय केंद्राचे (SDG-ICC)" सहाय्य घ्यावे. त्यानंतर नियोजन विभागाकडून मंत्रिमंडळ टिप्पणी व शासन निर्णयाबाबत दिल्या जाणाऱ्या अभिप्रायामध्ये त्याबाबतची पुष्टी करण्यात येईल.

३. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०११६३३४६२५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SHANKAR SHINDE

Digitally signed by SUNIL SHANKAR SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1c3a34f1f8dae5c5fcd9f88d8c5d7ec3123390afeea4b4c5c7aa39a9eee13124, pseudonym=099046B2BC3D8F0E787980C4F643F6396FFF3408, serialNumber=59F95E2C08396985879159012B3E6286A5D0215315EA137ED8975A37DA2D5F53, cn=SUNIL SHANKAR SHINDE
Date: 2022.02.08 17:40:24 +05'30'

**( सुनिल शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव,
४. मा. राज्यमंत्री {गृह (ग्रामीण), वित्त व नियोजन} यांचे खाजगी सचिव,
५. मा.मंत्री व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
७. मा. विधानपरिषद/विधानसभा सदस्य, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
९. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव(सर्व), मंत्रालय, मुंबई,

१२. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१४. नियोजन विभागातील उप सचिव(सर्व), मंत्रालय, मुंबई,
१५. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, वांद्रे, मुंबई,
१६. नियोजन विभागातील कार्यासने(सर्व), मंत्रालय, मुंबई,
१७. निवडनस्ती (का-१४१२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,